माझ्या मानसींची राधा
होती शोधीत आकार
ताई तुझिया रूपानें
झाली सगुण साकार
वाटे राधेच्या कुशींत
मूल होऊन शिरावें
हारपावा देहभाव
गंधरूपानें उरावें

**गोपालदा**

# प्रस्तावना

श्री. दाण्डेकरांचा व माझा परिचय होऊन एक तप झालें. माझ्या मुलांना हिंदी शिकवीत असतांना आपल्या अस्खलित पण मधुर वाणीनें ते त्यांना मंत्रमुग्ध करीत असत. मध्यंतरीं अनेक घडामोडी झाल्या. परंतु त्यांचा एक क्रम अजूनहि चालू आहे. तो असा—कांहीं नवीन लिहिलें कीं, तें मला वाचून दाखवायचें, अगर पाठ असलेलें म्हणून दाखवायचें ! एके दिवशीं दुपारीं ते अकस्मात् आले, आणि मला त्यांनीं आपली "यशोधरा" ऐकविली. माझ्यावर तिचा फार परिणाम झाला. मीं ती स्वतःशीं वाचायला मागून घेतली. दुसऱ्या दिवशीं मी त्यांना म्हणालों, "ही कुठें तरी बसविली पाहिजे ?" "बसवीत आहोंत. तुम्ही येतां का पाहायला ? तुमचें साहाय्य मिळेल तर फार छान होईल." "चला, निघूं याच." आम्ही शनवारांतल्या होळकर वाड्यांतील मुलींच्या हायस्कुलांत आलों. संगीतशिक्षक श्री. मारुलकर परिचयाचेच असल्यानें मलाहि संकोच वाटला नाहीं. तालमीला सुरुवात झाली. दांडेकर, मी व मारुलकर रोज तालमी घेऊं लागलों. मुलींनीं परिश्रमांची शर्थ केली. मला रंगीत तालीम पाहून समाधान वाटलें. प्रत्यक्ष प्रयोगहि परिणामकारक झाल्याचें कळलें. नंतर यशोधरा आम्हीं ( दांडेकर, सं. दि. गोळवलकर व मीं ) मुंबई रेडियोवर ध्वनिमुद्रित केली. श्री. कृष्णराव दीक्षितांना ती फार आवडली व रेडियो—श्रोत्याकडूनहि आवडल्याचीं पत्रें आलीं. अर्थात् दांडेकरांनीं रेडियोला योग्य व जरूर ते फेरफार केले होते व श्री. गोळवलकरांची संगीतरचनाहि अत्यंत यथातथ्य व रसपरिपोषक झाली होती. दांडेकरांची रचना सोपी, सुबोध व रसाळ असल्यानें श्रोत्याच्या मनावर ऐकतां ऐकतांच कसलाहि ताण न पडता परिणाम होतो, असा माझा अनुभव आहे. माझ्याप्रमाणेंच या संगीतिका वाचणारांना, पाहणारांना व ऐकणारांना हा प्रत्यय येईल असा मला विश्वास आहे. मराठी भाषेंत के. किर्लोस्कर, देवलां-प्रमाणें श्री. मर्ढेकर, टेंबे, रांगणेकर, दांडेकरादि लेखकांनीं संगीतिका लिहून त्यांचे प्रयोग केले, याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें उचित आहे.

हें झालें लेखकासंबंधानें. परंतु या संगीतिका बसविणारांवर व त्यांत भाग घेणारांवर त्या परिणामकारक करण्याची फार मोठी जबाबदारी असते,

हें मला आवर्जून सांगायचें आहे. यथातथ्य, रसानुकूल, पण सोपी स्वररचना जशी संगीतरचनाकारानें करायला हवी, तशीच ती स्पष्ट, पण सार्थ शब्दोच्चारांसह मधुर कंठानें गाऊन प्रेक्षकांतील शेवटच्या रांगेपर्यंत पोंचविण्याचें कार्य गायक–नटांचें आहे. याकरितां घ्यावेत तितके कष्ट व परिश्रम थोडेच असतात ! गळा कमवावा लागतो, वाणी शुद्ध करावी लागते. मायक्रोफोनच्या साहाय्याशिवाय जुन्या कृष्णराव गोरे, चिंतोबा गुरव, बोडसांप्रमाणेंच ही दुहेरी साधना करायची असते. पाठांतराचा प्रयास केशवराव भोसले व गडकऱ्यांप्रमाणें करणारांनीं, तसेंच कृष्णराव गोरे, केशवराव भोसले, चिंतोबा, गणपतराव बोडसांप्रमाणें मेहनतीनें गळे कमावणारांनींच संगीतिकेंत उडी घालावी. पानाचा तोबरा तोंडांत भरून बोबडया वाणीनें व कोत्या गळ्यानें गाणाऱ्या गबाळ्यांनीं या भानगडींत पडूं नये असा स्पष्ट इशारा देणें प्राप्त आहे !

हा नवा प्रकार वर्तवायचा म्हणजे प्रसंगानुकूल पार्श्वभूमि निर्माण करण्याची, परिणामकारक प्रकाशयोजना करण्याची फार आवश्यकता आहे. तसेंच जरूर तेवढया वादनकारांना आंत ठेवून घोटून बसविलेलें संगीत गायकांची गळचेपी न करतां वाजलें गेलें पाहिजे. संगीतिकेचें वातावरण बिघडेल अशीं वाद्यें नसावींत. तमाशांतील गायक अतिशय थोडया साथीवर लावण्या म्हणतात, तो आदर्श ठेवावा. छंदोबद्ध भाषणांमागील पोषक संगीत खरोखरीचें "पार्श्व" असावें, गोंगाट नसावा. पण सांगावें तेवढें थोडेंच आहे !

दांडेकरांना खेडयापाडयांतून, डोंगरदऱ्यांतून फिरण्याचा खूप छंद आहे. या प्रवासांत ते वन्य जमातींचें संगीत शिकतात, त्यांचीं गाणीं पाठ करतात, त्यांचे नाच शिकून येतात. आणि मग हें सर्व आमच्याकरितां निरनिराळ्या रूपांमध्यें लिहून ते प्रसिद्ध करतात. त्यांतलाच संगीतिका हा एक प्रकार आहे. त्यांचा हा छंद जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत एकेकाहून सरस संगीतिकांची त्यांच्याकडून अपेक्षा करायला काय हरकत आहे ?

मॉडेल हाऊस–मुंबई ४
ता. ५–५–५५

के. धा. भोळे

# प्रारंभिक

संगीतक किंवा संगीतिका हा शब्द जरी अलीकडेच रूढ झाला असला, तरी या वस्तूशीं भारतीयांचा परिचय फार प्राचीन कालापासून आहे. वैदिकांमध्यें देवे म्हणण्याची जी पद्धति रूढ आहे, बहुधा तिच्यांतच संगीतकांचें मूळ सांपडावें. सामवेदीयांचें सामगायनहि या बाबतींत लक्षांत घेण्याजोगें आहे. समोरासमोर बसलेल्या वैदिकांच्या दोन पक्षांपैकीं एकानें एक वैदिक ऋचा सस्वर गावी, आणि दुसऱ्यानें साभिप्राय, सावेश, स्वरमर्यादा न ओलांडतां तिला उत्तर द्यावें, अशा या संवादाभास निर्माण करणाऱ्या गान–प्रकारांतूनच आदिम संस्कृत नाटकांचा जन्म झाला असण्याची शक्यता आहे.

आजच्या गीतांचीं आणि पदांचीं वृत्तें संस्कृत नाटकांतील श्लोकांपेक्षां निराळीं आहेत. तरी ते संस्कृत श्लोकहि वीणेच्या स्वरावर गाइले जात असले पाहिजेत. उत्तरेंत आजहि कथावाचक कथांतून सस्वर श्लोक गातात. पण श्लोकांचा बांधीवपणा गेयतेला अडथळ्यासारखा भासून या मुक्ततेच्या आवश्यकतेपोटींच अष्टपद्यांचा जन्म झाला.

अष्टपद्या तर संगीतिकाच आहेत. गोपीनें आपली विरहव्यथा प्रगट करावी, आणि सखीनें तिचें समाधान करावें, असा प्रकार जयदेवाच्या अनेक अष्टपद्यांतून आढळतो. अमुक अष्टपदी अमुक एका रागांत गावी, असा संकेतहि ठरून गेलेला आहे. तेव्हां संगीतिका ही वस्तु शुद्ध भारतीय असून, ती ऑपेरा या पाश्चात्य प्रकाराचें अनुकरण नव्हे, एवढें इथें नमूद करणें आवश्यक आहे.

संस्कृत नाटकांचीं जीं मराठी भाषांतरें रंगभूमीवर आणलीं गेलीं, तींहि एक प्रकारें संगीतकेंच होतीं, असें विधान अप्रयोजक ठरणार नाहीं. साठ साठ, सत्तर सत्तर पदें गातांना रात्र संपून पहाट उजाडली आहे, अशीं तीं नाटकें

पाहिलेले प्रेक्षक अजून हयात आहेत. त्या पौराणिक नाटकांतून गद्य भाषण असे, पण तें दोन पदांचा सांधा जोडण्यापुरतेंच.

उदाहरणार्थ–( १ ) "हा कोण असावा बरें ?"
नव रवि किरणांचा.......
( २ ) "आणखी–"
स्वर्णाचा प्रसवे......
( ३ ) "बरें बरें !"
रणीं त्रिभुवनें......

आजच्या संगीतिका हें या पौराणिक नाटकांचेंच अपत्य आहे, हें लक्षांत येण्यासाठीं एवढीं उदाहरणें पुरेत.

मात्र रचनेच्या किंवा वृत्तांच्या दृष्टीनें या संगीतिकांचें स्वरूप या प्राचीन नाटकांहून निराळें आहे. शब्दांवाटे जो भाव प्रगट करायचा आहे, त्याला अनुरूप असें कोणतेंहि वृत्त–मग तें कदाचित् सुनीत किंवा गझलहि असेल–या नवीन संगीतिकांतून वापरलें जातें. यशोधरा आदि संगीतिकांतून अभंग वृत्ताचाहि उपयोग केला गेला आहे. आजचा मराठी भाषेचा ढाळ किंवा ठेवण लक्षांत घेतां प्राचीन विषयांसाठीं नवीनतम वृत्तें वापरूनहि कालविपर्ययाचा दोष पदरीं येण्याचें कांहीं कारण नाहीं. किंबहुना विशेषतः प्राचीन विषय आज सहज कळूं शकतील, अशा भाषेंत मांडायला हवे असतील, तर आज माहीत असलेल्या वृत्तांचाच उपयोग करणें इष्ट ठरेल. सन्तांनींहि प्राचीन कथानकें प्राचीन वृत्तांच्या अभिनिवेशास बळी न पडतां अभंग वृत्तांतूनच रचलीं आहेत.

या पांच संगीतिकांचें सामान्य स्वरूप लक्षांत येण्यासाठीं इतकें विवेचन पुरे. आतां या रंगभूमीवर प्रस्तुत करण्यासंबंधीं थोडेंसें–

या पांचांपैकीं 'परिव्रज्या' उपनिषद्कालीन, 'गंगातीरीं' रामायण–कालीन, 'यशोधरा' बुद्धकालीन आणि इतर दोन आजकालच्या आहेत. यशोधरा,

गंगातीरीं आणि इर्जीक या तीन नभोवाणीवरून प्रक्षेपित केल्या गेल्या आहेत. भारतीय नभोवाणीच्या अधिकाऱ्यांच्या सौजन्यानें त्या इथें प्रकाशित होत आहेत. ' वंजारीगीत ' या गीतावर पुण्याच्या आहिल्यादेवी हायस्कूलनें बसविलेल्या लोकनृत्यास यंदां मुंबई राज्य क्रीडामहोत्सवांत प्रथम पुरस्कार मिळाला.

**यशोधरा**—या संगीतिकेंतील सर्व प्रसंग यशोधरेच्या प्रासादांत घडत आहेत. तेव्हां रंगभूमीवर प्रासादाची सर्व ऐट उभी करावी. मागें एक मंचक, त्यावर भरजरी वस्त्रें, मोठमोठाल्या समया, शृंगारलेल्या चौपाया इत्यादि साधनांनीं प्रासादाचा आभास निर्माण करतां येईल. पहिल्या भागांत एका उत्तम तबकांत कांहीं फळें आणून ठेवावींत. तसेंच एका पुष्प—स्तबकांत मिळाल्यास कमळेंहि आणून ठेवावींत. गौतमाला मोह निर्माण व्हावा या हेतूनें सर्व प्रकारच्या सुखांची रेलचेल या प्रासादांत करण्यांत आली आहे, हें स्मरणांत असूं द्यावें.

वेषासांठीं अजिंठा आणि वेरूळ येथील चित्रें पाहावींत. त्या चित्रांशीं जुळतील असे वेष केल्यास अधिक उत्तम. या संगीतिकेंतील प्रथमखंड सकाळीं, दुसरा रात्रीं, आणि तिसरा संध्याकाळीं घडतो.

पहिल्या दोन खंडांत राहुल हा तीन वर्षांचा असून तिसऱ्यांत तो दहा वर्षांचा आहे. शेवटीं बुद्ध येतो त्या वेळीं त्यानें यतिवेष धारण केलेला आहे.

पार्श्वसंगीतासाठीं पाश्चात्य पद्धतीचीं वाद्यें वापरूं नयेत. मृदंग, वीणा, तानपुरा, झांज, सतार, अशा देशी वाद्यांचाच उपयोग केलेला चांगला. गीतांच्या साथीलाहि हींच वाद्यें असावींत.

संगीतदिग्दर्शकानें पद्यांना स्वरबद्ध तर करावेंच, पण ज्या पंक्ती केवळ लयबद्ध गद्यासारख्या आहेत त्यांनाहि आवश्यक तेथें स्वरबद्ध करावें. संगीतिका सुरू होऊन ती संपेपर्यंत ताल तिच्या पाठीशीं उभा आहे, हें प्रत्ययास आलें पाहिजे. शब्दांतील हा तोल अथवा लयकारी दृष्टीआड होऊं देऊं नये.

**परिव्रज्या**—कात्यायनी व मैत्रेयी यांचे वेष पुढीलप्रमाणें—विकच्छ पांढरी साडी, पांढऱ्या चोळया, ठसठशीत कुंकू, भस्म चर्चिलेलें, केसांच्या गांठी मारलेल्या. मैत्रेयी कात्यायनीहून थोडी वयस्कर आणि स्थिर, गंभीर प्रकृतीची आहे. कात्यायनी तरुण आणि नीटस आहे. सुबल आणि सुमुख हे राजदूत पीतांबर नेसले असून अंगांत बाराबंद्या, कमरेला शेले व डोई-वरील केशभार मोकळा असे आहेत. याज्ञवल्क्य गंभीर, शांत, तेजस्वी, भरलेल्या शरिराचे, वयस्क आहेत. डोकीवरील केशांच्या जटा वळलेल्या असून ते वर बांधलेले आहेत. दुकच्छ धोतराव्यतिरिक्त शरीर उघडें, भस्म-चर्चित आहे.

रंगभूमीची रचना पुढीलप्रमाणें—

रंगभूमीच्या मध्यभागीं एखादा वृक्ष. त्याभोंवतीं एक ओटा. मागील पडदा अरण्याचा असावा. हें स्थळ याज्ञवल्क्य ऋषीच्या आश्रमाचा एक भाग आहे. कोपऱ्यांत एखादी झोपडीहि उभी केलेली असावी. सूचकतेसाठीं म्हणून अभिनय सुरू असतां एखादी विद्यार्थिनी कमरेवर पाण्याचा घडा घेऊन आणि एखादा विद्यार्थी दर्भांची अगर समिधांची जुडी घेऊन इकडून तिकडे जावा.

विद्यार्थी आणि विद्यार्थिनी यांचेहि पोषाख आश्रमीय वातावरणाला पोषक असे असावेत.

पार्श्वसंगीताच्या सूचना मागीलप्रमाणें.

**गंगातीरीं**—ही संगीतिका गंगातीरावर घडत आहे, हें स्पष्ट आहे. तेव्हां पडदा नदीतीराचा असावा. तो न मिळाल्यास कोणत्याहि एकरंगी पडद्यावर अभिनय केला तरी चालेल.

गुह हा कोळी आहे. तेव्हां कोकणांतील कोळ्याचा वेष त्याला साजून दिसेल. गंधा त्याची पत्नी आहे. तिचा वेष कोळयाच्या बायकोसारखा पण जाडभरड असावा. पाहिजे तर गुहाच्या दंडांत पाटिलकीचें निदर्शक असें एखादें

चांदीचें कडें असावें. इतर सभाजन आणि वेत्रिक हे सर्व कोळी आहेत. पाशा ही त्याच जमातींतली एक आक्रस्ताळी, वयस्क स्त्री आहे. एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ती अशी कीं, कोळी आणि कोळणी यांचा वेष आणि केशभूषा ही रामायणकालास साजेशी असावी. म्हणजे कोळणी नेसत असलेल्या लुगडयांवर आजची कळा भासतां कामा नये.

राम, सीता आणि लक्ष्मण हीं तिघेंहि वनवासी आहेत. तेव्हां त्यांचीं वस्त्रें वनवासास साजेशीं असावींत.

पार्श्वसंगीत आणि गीतांच्या स्वरांविषयीं मागील सूचना येथें लक्षांत घ्याव्यात.

**वंजारीगीत**——हें संगीतक नृत्यासमवेत व्हावें. ढोलाची साथ अधिक साजून दिसेल. सगळें गीत एकाच रांगडया चालीनें म्हणावें. वंजाऱ्यांचे वेष मात्र वैशिष्ट्यपूर्ण आहेत. स्त्रिया आखूड घागरे नेसून चोळया घालतात. केसांच्या भांगाच्या मधोमध एक वीत उंचीची एक खुंटी उभी करून तीवरून ओढणी घेतलेली असते. हातांत खूप बांगडया. पुरुष लाल पागोटीं, बाराबंद्या आणि दुटांगी धोतरें असा वेष करतात. संगीतकांत अर्धे पुरुष आणि अर्ध्या स्त्रिया आहेत. संगीतक रानांत घडत असून मंडळी लग्नाची वरात घेऊन देवाच्या दर्शनाला निघाली आहे. नवरदेवाजवळ धनुष्यबाण आहे.

वंजारी ही विशेषतः माळव्यांत वैपुल्यानें आढळणारी एक शूर जमात आहे. अनेक वंजारी कुटुंबें अजूनहि गांवोगांव भटकत असून दरोडे घालून उपजीविका चालवीत असतात.

**इर्जीक**——ही ग्रामीण संगीतिका आहे. तेव्हां वेष आणि वाद्यें ग्रामीण असावींत. गीतांच्या चालीहि त्याच जातीच्या असाव्यात. प्रथम खण्डांतील सामूहिक गीतांबरोबर नृत्यहि साजून दिसेल. दुसऱ्या खण्डांत गोजाबाई दळीत बसली असतां तिचा नवरा येतो. दाजीबा हा म्हातारा सुखवस्तु

शेतकरी आहे. शेतकऱ्यांच्या वेषांत जुनेपणा दिसला तर अधिक बरें. म्हणजे गोजाबाईचें नेसूंचें लुगडें जुनेर असावें.

शवटील खण्डांत नृत्याबरोबरच नांगर चालले असल्याच्या अभिनयाची जोड मिळाल्यास फार उत्तम.

मला वाटतें, एवढें पुरे.

१५ ऑगस्ट १९५५
तळेगांव दाभाडे ( पुणें. )

गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर

• • •

# १ : यशोधरा

[ यशोधरेचा प्रासाद. प्रथम-नगर-दर्शनासाठीं आतुर झालेल्या गौतमाला प्राकाराबाहेर पोंचविण्यासाठीं यशोधरा-गोपा बाहेर गेली आहे. गौतमासाठीं आणविलेलीं विविध उपभोग-साधनें नीट मांडून ठेवलीं आहेत. दोन दासींपैकीं एक जण आधाशीपणानें त्या साधनांपैकीं फळें आणि फुलें यांच्याकडे पाहात दुसरीला म्हणते. ]

पहिली दासी : अग हीं कमळं ! द्राक्षं आणि फळं—

दुसरी दासी : भारी तूं आधाशी !

पहिली दासी : कां ग सांग कशी ?

दुसरी दासी : अग तीं आणिलीं गौतमांच्या साठीं

पहिली दासी : धन्याआधीं कां ग दासीची हांकाटी ?

[ यशोधरेची बालसखी श्यामा घाईघाईनें येते ]

श्यामा : त्वरा करा ग त्वरा करा
पळा लवकरी भरा भरा
येइल आतां यशोधरा !

पहिली दासी : यशोधरा ?

दुसरी दासी : यशोधरा ?

दोघी : म्हण युवराज्ञी यशोधरा !

श्यामा : कां रागवतां फुकाफुकी ?
ती तर माझी बालसखी

पहिली दासी : बालसखी ?

दुसरी दासी : बालसखी ?

श्यामा : हो ग हो ! ती बालसखी !
अलकेच्या कुंजांमधुनी
किती हुंदडलों बाळपणीं
गाउनि गाणीं
फेर धरोनी
किती नाचलों
किती धांवलों
किती भांडलों

पहिली दासी : काय तरि बाई !

दुसरी दासी : नवि नवलाई !

श्यामा : कां ग झालं काय ?

दोघी : अहो व्हायचंय् काय ?
तुमच्याशीं जपून बोलायला हवं–हूं ऽ ऽ
हांक मारतांच धांवायला हवं–हूं ऽ ऽ !

श्यामा : [ कानोसा घेऊन ]
शूत् शूत् शूत्
आली ग आली
गोपाराणी आली
उषेची लाली

खुले तिच्या गालीं
चंदेरी सुषमा
तिच्या भंवतालीं
[ उदास यशोधरा येते ]
कां हो गोपाबाई रुसल्यात कां ?
निंबोणीच्या झाडाखालीं बसल्यात कां ?
निंबोणीचं झाड करवंदी
गौतमांचा वाडा चिरेबंदी

यशोधरा : श्यामे !

पहिली दासी : वारा घालूं का ?

दुसरी दासी : पाणी आणूं का ?

श्यामा : व्हा ग तुम्ही दूर !
पुरे कौतुकाचा पूर
काय गोपाबाई !
बोलायचं नाहीं ?
आमच्याशींही नाहीं ?

सांग सखि मुख कां कोमेजलें ?
मदनमूर्ति कीं तव प्राणपती
नित वावरती तुझ्या संगतीं
कां दारीं अजि अशुभ कुणाचें
वद पाऊल वाजलें ?
सांग सखि मुख कां कोमेजलें ?

यशोधरा : श्यामे अग श्यामे !
कसं तुला सांगूं ?

सांग सखे मी दाउं कुणाला निज अंतरिंची व्यथा ?

त्यागुनिया कां प्रियतम जाती
संचरते ही शंका चित्तीं
दुःखान्ता कां होइल माझ्या संसाराची कथा?
काळ मत्त गज देउनि पाउल
तुडविल कां हें माझें घरकुल
न दिसे कोणी अडविल ऐसा प्रारब्धाच्या रथा!
सांग सखे मी दाउं कुणाला निज अंतरिंची व्यथा?

[ गौतम येत आहे ]

श्यामा : अग बाइ आले
युवराज आले
[ यशोधरा लगबगीनें पुढें होते ]

यशोधरा : यायचं! यायचं!
इथं बसायचं!
पाय चेपूं का?
गाणं गाऊं का?
श्यामे अग श्यामे!

श्यामा : आलें बाई आल्यें

प्रिया कुणाची उभी गवाक्षीं
इंदु नभींचा तेथुनि लक्षी
विरह—व्याकुला मनिं गुणगुणते
चवथीचा चांद लपे वनांत ग!
हुरहुर लागे माझ्या मनांत ग!

गौतम : होय गोपे हुरहुर!
जिज्ञासेला आला पूर
दुःख म्हणजे काय?
सुख म्हणजे काय?

प्रपंचाचा घाट
कुठं मोक्षाची वाट ?

यशोधरा : आज झालंय् तरी काय ?

गौतम : होय गोपे ! तुम्हाला तें समजायचं नाहीं
मला काय झालं तें उमजायचं नाहीं

यशोधरा : आतां थोडे झोंपा
आतां थोडे निजा

गौतम : झोंपूं !
निजूं ?
मी झोंपलों तर जागेल कोण ?
मी निजलों तर बोलेल कोण ?
बोलेल कोण ?
बोलेल कोण ?

[ पटाक्षेप ]

[ तीच रात्र. गौतम, यशोधरा व लहानगा राहुल झोंपलीं आहेत. गौतम अस्वस्थ मनानें अलगत उठून समोर येतो ]

गौतम : चिन्मय विश्वाची हीच कां सांगतां ?
चेतना येतसे धरून आकार
नाना रूपांनीं ती पावते विस्तार
कां ती स्तब्ध होते बोलतां चालतां ?
चिन्मय विश्वाची हीच कां सांगतां ?
गोजिरें शरीर साजिऱ्या पाउलीं
मानवी मनाला जणूं मोह घाली
मिळतें मातींत हालतां डोलतां !
चिन्मय विश्वाची हीच कां सांगतां ?
इथें एक प्रेत तिथें एक भोगी

वार्धक्य इकडे तिकडे तो रोगी
म्हणती सावधान स्मशानीं धांवतां
चिन्मय विश्वाची हीच कां सांगतां ?
काय शून्यरूप अवघा आकार ?
काय दुःखरूप अवघा संसार ?
गूढ उकलील काय कोणी ज्ञाता ?
चिन्मय विश्वाची हीच कां सांगतां ?

[ कांहीं क्षण संदेहावस्थेंत उभा राहातो ]

येतों यशोधरे येतों रे राहुला !
मुक्तीचा पथिक सोडोनी चालिला
गोपे स्वप्न तुझें राहूं दे अभंग !
मोकळा राहूं दे मुक्तीचा मारग !

[ निश्चय करून तो प्रासादाबाहेर पडतो. दोन निमिषांनंतर यशोधरा जागी होते. ]

यशोधरा : अगबाई ! नाथा !
अहो प्राणनाथा !
झाली ताटातुटी ?
गेले ना शेवटीं ?
श्यामे !

[ यशोधरेचे हुंदके ऐकून श्यामा धांवत धांवत येते. ]

श्यामा : गोपे ! अग गोपे !
पति कुठं गेले ?

यशोधरा : गेलेत ते सखी
योगाच्या साधना
आर्त हांक माझी

जिथं पोहोंचेना
तिथून येईना
फिरून साधक
तिथं पत्नी पुत्र
होताती बाधक
ऐक सखे श्यामे
ऐशा कुण्या स्थळीं
आम्हांला टाकून
गेले वनमाळी !

श्यामा : कसं ग हें झालं ?
कसं ग हें झालं ?
गोपे तुझं धन
कसं हारपलं ?

यशोधरा : काळोखी रजनी
काळोख पसरे
मंद चमकती
नभांगणीं तारे
मी आणि राहुल
शांत झोपलेलीं
अशा वेळीं गेले—
अशा वेळीं गेले
चोरट्या पाउलीं !
सखे त्यांनीं मज
नाहीं ओळखिलें !
आज माझे हातीं
कांहीं ना उरलें !

आम्ही वीरकन्या
शूरांच्या कामिनी
स्वामींना धाडितों
रणीं सजवोनी
मुक्तीचा मारग
कां मी आडवीतें ?
सखी ते मजला
सांगोनिया जाते
सखी ते मजला
सांगोनिया जाते !

श्यामा : गोपे ! गोपे ! गोपे !

यशोधरा : सासूबाई येतील
काय त्यांना सांगूं ?
महाराज येतील
तेव्हां कशी वागूं ?
त्यांच्या पुढतीं मी
उभी कशी राहूं ?
मौनरूप राहीन
सर्वी मुकाट्यानं साहीन !

[ राहुल झोंपेंतून उठून येतो ]

राहुल : आई ग आई ग
तात कुठं गेले ?

यशोधरा : ये रे राजा तुज मज
टाकोनिया गेले !

देवाचिये शिरीं काल जीं चढलीं
पायदळीं आज पुष्पें चुरडलीं

हाय रे स्त्रीजन्मा  हींच तुझी कथा
अमृत अंतरीं  नयनांत व्यथा!

[ पटाक्षेप ]

[ गौतमाची वाट पाहात यशोधरेनें सात वर्षें काढलीं आहेत. सात वर्षांनंतर म्लानवदना उदास यशोधरा आसनावर बसली आहे. श्यामा तिचे केश सारखे करीत आहे. अचानक कुण्या पार्श्व-गायकाचें संगीत ऐकूं येतें. ]

पार्श्वगायक : दिनकर गेल्यावरी  सांगा प्रकाश राहिल का?
दुर्दिन आल्यावरी  सांगा विकास होइल का?
इंधन सरल्यावरी  सांगा रंधन होईल का?
प्राणचि गेल्यावरी  सांगा बंधन साहिल का?
वर्षा सरल्यावरी  सांगा अभ्रें असतिल का?
रंगचि विरल्यावरी  सांगा शोभा दिसतिल का?
लक्ष्मी रुसल्यावरी  सांगा संपद राहिल का?
गौतम नसल्यावरी  सांगा प्रमोद होइल का?

यशोधरा : अंत माझा कां पहाशी
सोड श्यामे केशराशी

कां सजवूं हा कचसंभार?
कौतुक याचें केलें ज्यानीं
हारपले ते स्वप्न होउनी
अतां कशाला मिरवूं सखे
वृथा शिराला भार?
सात शिशिर ऋतु गेले निघुनी
उदासवाणी दिवसयामिनी
गमलें मज सखि जीवनयात्रा
निष्फल होय असार!

[ केविलवाणा राहुल धांवत येतो ]

राहुल : आई ग आई ग
सखे पुसतात
कुठं तुझे तात ?
काय त्यांना सांगू ?
काय त्यांना सांगू ?
सांग आई, सांग
कां ग आला राग ?
बोलत नाहींस तूं ?
रागावलीस तूं ?
कुणाकडे जाऊं ?
आई !
कुणाकडे पाहूं ?

[ यशोधरा खिन्नपणें त्याला जवळ घेते ]

यशोधरा : झोंपीं जा राजा
गातें मी गाणें
राहुल माझा
जीवाचें लेणें
फांदीवरी तो
काऊ बोलतो !
तुज केव्हांची
साद घालितो.

राहुल : आई ग ! तातांना
पत्र मी लिहीन.

यशोधरा : काय लिहिशील ?
कसें लिहिशील ?

राहुल : असें मी लिहीन
अट्टी गट्टी बारगट्टी
अशोकाचा पाला हालत नाहीं !
आम्ही तातांशीं बोलत नाहीं !

यशोधरा : कां रे माझ्या राजा
कां रे रुसलास ?
गाल फुगवोनी
कां रे बसलास ?

राहुल : मग आम्हां तात
टाकुनी कां गेले ?
राहुल त्यांच्याशीं
मुळींच ना बोले !

[ राहुल आईच्या कुशींत तोंड लपवतो. ]

श्यामा : चल रे राहुला
खेळायला जाऊं
रुप्याची गोटी
चंदनाचा भोंवरा
चेंडू अन् दांडू
आपण डाव मांडूं

राहुल : तूं अन् मी ?

श्यामा : हो ! तूं अन् मी

[ दोघें बाहेर जातात. ]

यशोधरा : तुम्ही किती कां दूर धरा
प्रभु ही तंव तुमची यशोधरा !
तुम्हांसंगें पहिलें पाउल
आनंदाची पहिली चाहुल

बाळ गुणाचा माझा राहुल
काथिन घोषुनी चराचरा
प्रभु ही तुमची हो यशोधरा !
अपूर्व तृप्तींतुनि झरलेले
स्मृतिंनीं तुमच्या जे भरलेले
आपण सेवुनियां उरलेले
खुशाल मधुघट रिते करा
प्रभु ही तंव तुमची यशोधरा !

[ दूरवर नगरवासी गातात ]

नगरवासी : या हो या गौतमा यावें लवकरी
उदास नगरी वाट पाहे !
शोधितां तुम्हांसी शिणले नयन
या हो समाधान करावया !
यावें पुरुषोत्तमा यावें हो सिद्धार्था
वियोग हा आतां न साहवे !

यशोधरा : उदास नगरी
आतां न पाहवे
एकान्त विरह
आतां न साहवे
या हो अंतरींच्या
सुखाचे जनिते
या हो अंतरींच्या
व्यथेचे निर्माते !

[ पार्श्वसंगीतांत बदल होतो. नगारे, कर्णे, सनई आदि मंगलसूचक वाद्यें वाजूं लागतात. ]

उद्घोषक : ऐका रे पौरांनो, ऐका ग्रामस्थांनो

होऊं द्या संतोष
वाजवा दुंदुभी
वाजवा नगारे
आले हो गौतम
आले प्रियतम !

श्यामा : [ बाहेरून धांवत येऊन ]

आले सखि आले
तुझे देव आले !
आतां माझी कळी
पुनः खुलायाची
आतां पतीसंगें
पुनः डोलायाची

ऐक सखि आले तत्रभवान्
लता बहरल्या फुलल्या वेली
रानपांखरें प्रमुदित झालीं
कळली त्यांना शुभवार्ता ही
आला त्यांचा प्राण
दारोदारीं रंगवल्लिका
काढुं लागल्या पौरबालिका
सजूं लागती नगरपुरंध्री
गाती स्वागतगान
अणूंअणूंतुन कणांकणांतुन
आनंदाचें स्फुरतें जीवन
हा बुद्धांचा ? नव्हे नव्हे ग
तुझाच हा सन्मान

पुरे जाहलें रुसणें आतां
शोकाची तव सरुं दे गाथा
गोपे ! चल त्यांचिया दर्शना
सांडुनिया अभिमान

[ नुकती कुठें यशोधरेची कळी उमलूं लागली आहे, तोंच दवंडी ऐकूं येते ]

उद्‌घोषक : ऐका रे पोरांनो
ऐका ग्रामस्थांनो
आले हो सिद्धार्थ
होउनी विरागी
जिंकोनी संसार
झाले वीतरागी

यशोधरा : ऐक ऐक श्यामे
पुनः ऐक घोष !
ज्याच्यामुळें झाला
एवढा संतोष !
हो ! आले गौतम
परी ते विरागी
घरीं परतले
परी वीतरागी !
मी कोण म्हणून
त्यांच्यापुढें जाऊं ?
त्यांचा तो विराग
सांग कसा साहूं ?
नाहीं मी जायाची
नाहीं मी जायाची
मार्गींचा कंटक

नाहीं मी व्हायाची
नाहीं—नाहीं—नाहीं !

मानिनी मी मानिनी
हाय मी हतभागिनी
मानिनी मी मानिनी
जीवनाची संगिनी मी
योगियाची योगिनी मी
कां मला सांडोनि गेले
विरहदु:खाच्या वनीं !
घ्यायची माझी परीक्षा
घेतली असतीच दीक्षा
मीच कां मागें रहातें
काननीं विजनीं रणीं ?
ते सुखें येवोत येथें
दर्शनाला मी न जातें
आसवें माझीं पुसावीं
गौतमांनीं येउनी !

[ काषाय वस्त्रें धारण केलेला स्थिरबुद्धि गौतम येतो. त्याला पाहतांच यशोधरा श्यामेच्या खांद्यावर कोसळते. ]

गौतम : गोपे !
ऐक गोपे !
तुझ्याच तपाच्या
चांदण्याच्या तेजीं
आजच्या बुद्धानें
पण—
कालच्या गौतमानें

शुद्ध निर्वाणाचा
पंथ चोखाळला !
ऐक यशोधरे !
बोधिवृक्षातळीं
स्वर्गींची अप्सरा
आलीसे सोडीत
अनंगाचे बाण
तेव्हां—
तेव्हां ऐक गोपे !
क्षणमात्र माझें
चैतन्य हाललें !
पण ऐक गोपे—
छायेच्या रूपानें
ठाकलीस पुढें
अभयाचा कर
ठेवलास शिरीं
आणि—
बुद्धाच्या हृदयीं
स्फुरली प्रेरणा !
तयानें पुशिलें
स्मिताच्या मुद्रेनें
कां आलीस माते ?
कां ग कष्टलीस ?
लाजोनी अप्सरा
गेली परतोनी !
बुद्धाच्या जननी !

तूंच राखलेंस
गौतमाचें शील
तूंच निर्वाणाच्या
ज्योत मार्गांतील !

यशोधरा : पुरे स्वामी पुरे
इतुकेंची पुरे !
एवढ्या पुण्यानें
गोपा ही उद्धरे !
कुणा न सांगतां
कुणा न बोलतां
भोगीन हें सुख
उन्मनींत आतां
हें असो तुमचें
तुम्हासी अर्पण
बुद्धदेवा माझें
तनमनधन—

बुद्धदेव : ॐ भवति भिक्षां देहि !

यशोधरा : राहुला वेगळी
काय घालूं भिक्षा ?
याला द्यावी आतां
निर्वाणाची दीक्षा !
म्हण बाळ !

बुद्धदेव : धम्मं सरणं गच्छामि

राहुल : धम्मं सरणं गच्छामि

बुद्धदेव : संघं सरणं गच्छामि

राहुल : संघं सरणं गच्छामि

सर्व जण : धम्मं सरणं गच्छामि

संघं सरणं गच्छामि

[ सर्वजण बुद्धचरणीं लीन होतात ]

बुद्धं सरणं गच्छामि

( पटाक्षेप )



*

# २ : परिव्रज्या

## प्रथम खण्ड

[ आश्रमाचें दृश्य : पडद्यामागें शांतिघोष सुरू आहे. ]

ॐ सहनाववतु सहनौ भुनक्तु
सहवीर्यं करवावहै तेजस्विनावधीतमस्तु
मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

[ दोन चार विद्यार्थिनी किलबिल करीत येतात ]

पहिली : अग ए सरिते, निघालीस कुठं ?

दुसरी : ती निघाली सरितेवरी !

[ सगळ्या हंसनात ]

तिसरी : आम्हाला येऊं दे

पहिली : आम्हाला येऊं दे

सगळ्या : चला बाई चला
पाठ आमचा झाला
गंगेवरी चला, आतां स्नानाला चला !
स्नानाला चला ! स्नानाला चला !

[ विद्यार्थिनी जातात. दोघे राजदूत, सुमुख व सुबल येतात ]

सुमुख : ये सुबला ये सत्वर
दृश्य पहा हें सुंदर
राहतात येथ गड्या
याज्ञवल्क्य योगीश्वर

सुबल : अहाहा! सुमुखा,
वाटते धन्यता
येथ रे कैवल्य
प्रत्यक्ष नांदतें
शांत जळणारी
यज्ञाग्नीची शिखा
आम्हाला सांगते
त्यागाचा संदेश
येथींचें लक्षण
भव्य साधेपण
विलसे सर्वत्र
साम्राज्य त्यागाचें!
धन्य झाला जन्म
सांग झालें कर्म
अशा आश्रमास
घेऊन संदेश
जनक राजांनीं
धाडिलें आम्हास

सुमुख : सांभाळ सुबला
तुझा भावावेश!

सुबल : कां?

सुमुख : बाबा रे त्यागाची
होऊन प्रेरणा
तूं ही बसशील
फांसून विभूती !

सुबल : तुला कां दिसेना
स्थानाचें माहात्म्य ?

सांग त्याग धरुन रूप काय येथ पातला
कां नभास त्यजुनि उषा येथ येत भूतला
मित्रा हें मंगलपण
जनहृदयां झणिं जिंकुन
कामक्रोध मद मत्सर नेत रे रसातला

सुमुख : ऐक रे सुबला
आपण सामान्य
तुझ्या घरीं कांता
आणि बारा मुलें
आहे ना तयांचें
तुजला स्मरण ?
सांगून मुनींना
नृपाचा संदेश
चाल झडकरी
आपुल्या कोटरीं !

सुबल : [ निश्वास सोडून ]
होय गड्या होय
बोल तुझे खरे—
कावळ्याला कशा
मोराचे पिसारे !

[ एक विद्यार्थी येतो ]

विद्यार्थी : यावें पथिकांनो
कोण तुम्हा हवें ?

सुबल : जनक राजांचा संदेश घेऊन
आलों आम्ही जाण राजदूत
ऋषि याज्ञवल्क्य त्यागाची ती मूर्ती
आम्हाला संप्रती भेटती कां

विद्यार्थी : थांबा ! जरा थांबा !

[ धांवत आंत जातो, व कात्यायनीला घेऊन येतो ]

सुमुख : त्यागाच्या राज्याची
शोभली जी राणी
पहा ही सुबला
माता कात्यायनी

दोघे : मातुश्री, प्रणाम !

कात्यायनी : नृपाच्या दूतांनो
आणिली कां वदा
राजधानीहून
सुवर्णसंपदा—
कुठें ऊर्ण वस्त्रें
मधाचे कलश ?
चन्दनाचीं काष्ठें
कुठें रे पलाश ?
कुठें धूतवस्त्रें
कुठें पीतांबर ?
यज्ञपात्रें कुठें

धान्याचे संभार ?
कुठें दूध दहीं
कुठें यव तिल ?
कुठें कडधान्यें
कुठें घृत तेल ?

सुबल : [ आश्चर्यानें ] मातुश्री—

सुमुख : माते आम्ही येथ
आलों आश्रमास
ऋषींना सांगण्या
नृपाचा संदेश

कात्यायनी : [ विरस होऊन ]
न आणतां द्रव्य
नुसता संदेश ?
सुवृत्ता ने यांना
जेथ हृदयेश—

[ सुवृत्त त्या दोघांसह जातो. मैत्रेयी कांहीं क्षणापूर्वी येऊन मागें उभी राहिलेली असते, ती पुढें येते ]

मैत्रेयी : कात्यायनी—

कात्यायनी : मैत्रेयी देवी—

मैत्रेयी : काय हें कात्यायनी !

कात्यायनी : काय ?

मैत्रेयी : लोभ तुला इतका कशाला
आश्रमवासी निर्मम मुनिजन
संसाराचें तुटलें बंधन

तरुतल वसती करतल भिक्षा
पंकीं फसविसि कां अशाला

कात्यायनी : [ हंसते ]

बाई ही तुमची
खटयाळ सवत
हृदयांत तिच्या
असंख्यात हेत

मैत्रेयी : असं ?

कात्यायनी : हो बाई–

जें जें दिसतें नवें नवें
मज हवें हवें ग सर्व हवें
स्वर्ग हवा मज सर्ग हवा
सुखकर मज अपवर्ग हवा
पंकज चन्दनगन्ध हवा मज गोवत्सांचे भव्य थवे
पंचम मजला मन्द्र हवा
हिमकर मजला चन्द्र हवा
दूध हवें मज तूप हवें मज परोपरींचे रम्य दिवे
स्वर्ण हवें मज शंख हवे
सुख मजला अकलंक हवें
मरण नको सखि अमृत यावें धांवत माझ्या सवें सवें

मैत्रेयी : [ आश्चर्यानें ]

सांग कात्यायनी
मला बाई सांग–
पालटलें कां ग
तुझें अन्तरंग ?

यांनीं जेव्हां तुज पर्णोनी आणिली
तेव्हांची ती मूर्ती सोन्याची पुतळी
तेजाची ती रेखा मूर्तिमती उषा
चान्दण्यानें न्हाली माधवी ती निशा
आज अशी कां ग लोभांत गुंतली

कात्यायनी : बाई — !

मैत्रेयी : निरोप घेवोनी
आले राजदूत
तयांना पुससी
कलशांची मात?

कात्यायनी : बाई !

तुम्हां कां न कळे माझें अभ्यंतर
भोंवतीं कां झाला एवढा अंधार
ऋषींची मी कन्या मला कळे त्याग
मजला उमजे विवेक विराग
परी आश्रमचा मजवरी भार
माझ्या भोंवतालीं चिमुकले जीव
शिकाया जे आले सानुले राजीव
तयांचीच चिंता मजला अपार
मोडा पाठशाळा सोडा अध्यापन
हांकून मुलांना द्यावें रानोरान
मग घ्यावी माझी परीक्षा कठोर

मैत्रेयी : कात्यायनी—

कात्यायनी : हो बाई—

मैत्रेयी : कां झालिस ऐसी विव्हल कात्यायनी
कां मंद जाहली शुक्राची चान्दणी

कात्यायनी : बाई सर्व मज लोभी म्हणतात
लहान मनाची क्षुद्र गणतात
म्हणूं दे तयांना—
पण—
तुम्हींही म्हणावें ? तुम्हींही—

मैत्रेयी : नाहीं माझ्या बाई
ओळखल्यें तुला
होऊं नको अशी
उगीच विव्हला
दूत येतांक्षणीं
तुवां त्यां पुशिलें
तेंच माझे मनीं
थोडेंसें बोंचलें

कात्यायनी : काय सांगूं बाई आटल्यात गाई
मुलांना पुरेसें अंथरूण नाहीं—
[ याज्ञवल्क्य येतात ]

याज्ञवल्क्य : ऐक गे मैत्रेयी
ऐक कात्यायनी

कात्यायनी : आपण ?

याज्ञवल्क्य : होय !
आतां तुला नको आश्रमाची चिन्ता
विश्वाचा चालक सर्व पुरवीता

कात्यायनी : काय ? काय ?
झालें तरी काय ?

याज्ञवल्क्य : जनकाकडून
आलासे संदेश

कात्यायनी : कसला ?

याज्ञवल्क्य : नृपानें माण्डिला
विलक्षण पण
सुवर्ण मुद्रांचे
सहस्र कलश—
सहस्र गोधन
शुद्ध सुवर्णानें
शिंगें झांकलेलीं—
एवढें मिळेल—

कात्यायनी : कुणाला ?

याज्ञवल्क्य : जो कां ब्रह्मनिष्ठ
श्रोत्रिय वरिष्ठ—
तयाला— (जातात)

कात्यायनी : [ अत्यानंदानें ]
अहा ! अहा !

मैत्रेयी : एवढा संतोष ?

कात्यायनी : मोद भरे हें मन बहरे
जिंकुनियां हे येतिल गोधन
कलश धनाचे देतिल आणुन
दैन्य पळे सखि भाग्य फळे
आजि मम अंगणिं झरतात झरे

मैत्रेयी : काय करशील
सांग गोधनाचें ?

कात्यायनी : काळ्या पुष्ट गाई
भारावले स्तन
आपुल्या हातानें
आनंदें दोहीन
विरजून दहीं
करूनी मंथन
काढूनिया लोणी
काढूनिया लोणी—

मैत्रेयी : मग ?

कात्यायनी : मग—मग मी तें
तुम्हांला वाढीन !

[ मैत्रेयीला घट्ट आलिंगन देते. प्रथम खण्ड समाप्त ]

## द्वितीय खण्ड

[ मैत्रेयी मुलांना शिकवीत बसली आहे. कात्यायनी धांवत येते. ती गडबडीनें त्या मुलांना वेगळालीं कामें सांगते ]

कात्यायनी : ऐक ग वंदने
पुष्पें बकुळीचीं
आणोनियां गुंफा
तुम्ही पुष्पहार
आणि तूं साधने
यज्ञकाष्ठें तुम्ही
आणोनीयां रचा
वेदीच्या समोर

आम्रपल्लवांचीं
सुबक तोरणें
बांधून शृंगारा
आश्रमाचें दार
आणि तूं विबुधा
जाऊन काननीं
आण जा कोमल
कांहीं दुर्वांकुर

मैत्रेयी : कां ग कात्यायनी ?
एवढा उल्हास ?

कात्यायनी : बाई !
बाल्हीक मघांशीं
आश्रमीं ठाकला
घेऊन संदेश—
घरासी यायचे
आज हृदयेश
संगें त्यांच्या गाई
धनाचे संभार
बाई ! तुम्ही सांगा
स्वागतासी काय
करूं उपचार ?

काय मी सांगा करूं
नाकळे हा भावनांचा वेग कैसा आवरूं
धुंद झाल्यें मी यशानें
विजयरूपी मधुरसानें
कुंद या विवरांत आतां तेज लागे सचरूं

पंख फुटले या मना ?
धांवतें दाही दिशांना
कल्पना सैराट झल्या त्यांस कैसी सांवरूं

आतां घरीं येत अमाप संपत्ती
व्यय कसा करूं ही एक आपत्ती !
नाहीं तर बाई
असें करूं या का ?

मैत्रेयी : कसें ?

कात्यायनी : करूं आमंत्रित अवघे तापसी
आश्रमीं बोलावूं सन्त मुनी ऋषी
ध्यानी जपी आणि विरक्तांचा मेळा
दशदिशांतून करूं येथें गोळा

मैत्रेयी : मग ?

कात्यायनी : मग आम्ही करूं
दाशरात्र याग

मैत्रेयी : हूं ?

कात्यायनी : करूं मग त्यांत
अन्न–संतर्पण
कैसा आनंदाचा
असेल तो क्षण !
नाहीं तर–

मैत्रेयी : नाहीं तर काय ?

कात्यायनी : असं केलं तर ?

दारीं येतील जे दरिद्र याचक
त्यांना वांटूं द्रव्य गाय एक एक

जीर्ण तनूवरी पांघराया वस्त्रें
मोडक्या कुटींत वापराया पात्रें
होईल तयांना आनंदीआनंद
घुमेल दिशांतीं एक जयनाद
—ऊंहूं—हें नाहीं !

मैत्रेयी : नाहीं ?

कात्यायनी : ऐका—
नाना देशींचे जे
विद्यार्थी साधक
न्याय सांख्यशास्त्र
योगाचे पाठक
त्यांना जन्मभरी
देऊं येथ स्थान
यथासांग त्यांचें
व्हावें अध्ययन
—किंवा—

मैत्रेयी : आतांही किंवा ?

कात्यायनी : ऐका बाई !
ज्ञानार्थी कन्यांचें काढूं गुरुकुल
आणि त्यांना बाई तुम्ही शिकवाल !

मैत्रेयी : ऐक कात्यायनी
एक मला सांग

कात्यायनी : काय ?

मैत्रेयी : सहस्र त्या गाई
बांधशील कुठें ?

कात्यायनी : कुठें ? कुठें—
असं करूं या का ?
मैत्रीय : कसं ?
कात्यायनी : पर्णशालांतून
विद्यार्थी काढून
तिथं बांधूं गाई !
मैत्रेयी : आणि विद्यार्थी
कात्यायनी : विद्यार्थी ?
राहतील सारे
आपुल्या आश्रमीं—
मैत्रेयी : आणि आपण ?
कात्यायनी : आपण ? आपण—
मैत्रेयी : आपण सोडून
अपुला आश्रम
होऊं या संन्यासी—
कात्यायनी : संन्यासी ?
: [ याज्ञवल्क्य येतात ]
याज्ञवल्क्य : मैत्रेयी इथेंही
संन्यासाची चर्चा ?
कात्यायनी : आपण ?
याज्ञवल्क्य : होय—
कात्यायनी : [ अत्यानंदानें ]
अहो घ्यावा अर्घ्य
स्वीकारावें पाद्य
मग त्या आसनीं
क्षणैक बसून—

[ धांवत आंत जाते ]

याज्ञवल्क्य : काय हें मैत्रेयी ?

मैत्रेयी : [ हंसून ]

आज कात्यायनी झाली असे धुंद
जणूं तिच्या शिरीं यशाचा उन्माद

याज्ञवल्क्य : पण—पण—
जेव्हां तिला कळेल—

[ कात्यायनी दुग्धपात्र घेऊन धांवत येते. ]

कात्यायनी : एवढें हें दूध
पिऊनियां आतां
आम्हांला सांगावी
विजयाची कथा !
कुठें आहे द्रव्य ?
कुठें तें गोधन ?
कां झाला उशीर ?
न आलें अजून ?

याज्ञवल्क्य : ( हंसून ) ऐक कात्यायनी—

कात्यायनी : सांगावें—
[ विव्हल होऊन ]
काय करूं ? झाल्यें
वेडी मी आतुर—

याज्ञवल्क्य : धैर्यानें सहावा
आनंदाचा भार
एऱ्हवीं जैं येतो
विषादाचा क्षण

तोलवेना मना
होतें छिन्नभिन्न !

[ क्षणभर थांबून ]

ऐक कात्यायनी—
जनसमूहानें दाटलेली सभा
सम्राट् जनक तींत होता उभा
सावेग बोलला—

कात्यायनी : काय ?

याज्ञवल्क्य : तो म्हणाला—

असेल जो कोणी श्रोत्रिय वरिष्ठ
विशुद्ध तपस्वी जो कां ब्रह्मनिष्ठ
तयानें हें न्यावें गोधन सुवर्ण
ऐकावें ऋषींनो ह्याचि माझा पण !

कात्यायनी : मग ?

याज्ञवल्क्य : मग ?

अवघीच सभा राहिली तटस्थ
कोणीही बोलेना कोणीच हालेना
शेवटीं जनक पुनः झाला उभा
तो म्हणाला—
काय मी समजूं हाच याचा अर्थ—
ज्ञानियानें शून्य झालें आर्यावर्त ?

मैत्रेयी : मग ?

याज्ञवल्क्य : [ हंसून ] मग काय ?

राहिलों मी उभा
शिष्या पाचारून

वदलों गाईंना
नेईं रे हांकून !

कात्यायनी : अग बाई ! त्यानंतर ?

याज्ञवल्क्य : सुरू मग झाला
प्रश्नांचा वर्षाव !

मैत्रेयी : वर्षाव ?

याज्ञवल्क्य : होय एक एक
रथीमहारथी
पुसूं ते लागले
कैवल्याची प्राप्ती

मैत्रेयी : मग ?

याज्ञवल्क्य : सहजच केलें
त्यांचें समाधान

कात्यायनी : बाई मी तुम्हाला
सांगितलें होतें–

याज्ञवल्क्य : ऐक कात्यायनी
शेवटील प्रश्न–

कात्यायनी : काय ?

याज्ञवल्क्य : महान् तपस्वी
वृद्ध सामश्रवा
पुसता तो झाला
मजला तेधवां

कात्यायनी : काय ?

याज्ञवल्क्य : ब्रह्मनिष्ठा कशा व्हावें गा सुवर्ण
कशा हवा लोभ ? कशाला गोधन ?

कात्यायनी : अग बाई ! मग ?

याज्ञवल्क्य : ऐक कात्यायनी–

म्हणता मी झालों आइकावें मुने
एवढें सुवर्ण एवढीं गोधनें
हें तों आहे सारें आश्रमाकारणें–
तिथें माझी भार्या आहे कात्यायनी
तीच या धनाची समर्थ स्वामिनी
आणि मी–

कात्यायनी : आपण–

याज्ञवल्क्य : आणि मी–
निरवून सर्व प्रपंचाचा पाश
आठव्या दिवशीं घेईन संन्यास !

कात्यायनी : [ आवेगानें ] काय ?

याज्ञवल्क्य : होय कात्यायनी !
आठव्या दिवशीं
घेईन संन्यास !

कात्यायनी : [ थरथरत ] अहो ! अहो ! बाई !

( कोसळते. द्वितीय खण्ड समाप्त. )

## तृतीय खण्ड

[ कात्यायनी वृक्षाच्या खोडावर मस्तक टेकून बसली आहे. मैत्रेयी येते. ]

मैत्रेयी : कात्यायनी–

कात्यायनी : थांबा ! थांबा बाई !
मनासी असह्य झालासे अघात
काय करूं सांगा–
पतिदेव मज सोडोनी जातात !

मज ऐलथडी ना पैलथडी
आज कशी सखि ही विरहाची अवचित नकळत येत **घडी**
यशोमंदिरीं मिरवे आसन
तेथ विराजित माझें मीपण
धुंद यशोरस सेवित असतां अघटित मजवरि घेत उडी
झोंक्यावर गगनाच्या प्रान्तीं
हिन्दोळत मी दिवसां रातीं
नवल वर्तलें भान हरपलें प्राण चालला त्यजुन कुडी
मांडियलें मीं माझें घरकुल
रंगुनि गेल्यें झाल्यें निश्चल
संसाराच्या भातकुलींतिल उठुन चालला खेळगडी

**मैत्रेयी** : कात्यायनी ऐक–
सोसावे लागती
दैवाचे आघात
तेव्हां आनंदाचे
क्षण दिसतात

**कात्यायनी** : आनंद ?
आतां काढूं नका नांव आनंदाचें
हारपले क्षण ते कांहीं हर्षाचे
उरला केवळ शोकाचा अंधार
जयाला दिसेना कांहीं आरपार
आणि बाई–
तुम्हीच झालांत दुःखाचें कारण
शेवटीं तुमचें उमजलें मन !

**मैत्रेयी** : कात्यायनी–

कात्यायनी : हो बाई–
तुम्हींच दोघांनीं
मजला केलेंत
आश्रमचालिका !

मैत्रेयी : ऐकशील कां ?

कात्यायनी : मीही कशी वेडी मजला न कळे
अचानक कैसे अंध झाले डोळे !
होऊन बसल्यें आश्रमचालिका
दूर हारपला माझा प्राणसखा !

मैत्रेयी : शान्त हो कात्यायनी
कां असा वैशाख जागे आज अवचित श्रावणीं
बुद्धि तव गे पारखोनी
सखि तुला योगीश्वरांनीं
धीमती जाणोनि केलें आश्रमाची स्वामिनी

कात्यायनी : नको बाई मज फसवा तो मोह
तोडिला या क्षणीं पाश निःसंदेह

मैत्रेयी : पुढें मग ?

कात्यायनी : ज्या योगें दुरावे
जीवींचें निधान
भार आश्रमाचा
फेंकून देऊन–

सखि मी होइन त्यांची छाया
मार्गावरुनी प्रियतम जाती
पायतळींची होइन माती
रात्रंदिन मी भंवतीं राहिन
ब्रह्मासंगें माया

स्नानांतीं मी होइन चंदन
विश्रान्तीस्तव होइन उपवन
वारिन कंटक चरणतळींचे
झिजविन माझी काया
योगीशांच्या अंकावरतीं
या प्राणांच्या विझतिल ज्योती
तोषुनिया मग म्हणातिल मुनिजन
धन्य ऋषींची जाया

मैत्रेयी : तुझ्या संकल्पानें
जें काय होईल
तयाची तुजला
आहे ना कल्पना ?

कात्यायनी : काय होईल ?

मैत्रेयी : योगीश्वरांचेंही शान्त स्थिर मन
खेदानें हलेल थोडें एक क्षण

कात्यायनी : बाई—

मैत्रेयी : होय कात्यायनी !
तुजवरी भार आपुला टाकून
संन्यास घेताती तुझे प्रियजन
नको होऊं त्यांच्या पायांतली बेडी
सोड सखी त्यांना मायापाश तोडीं

कात्यायनी : बाई—

मैत्रेयी : होय—
तुझ्या दारीं उभा अपूर्व याचक
मागतो तुजला अनुज्ञेची भीक

[ याज्ञवल्क्य येतात ]

**याज्ञवल्क्य** : सांग ना कात्यायनी !
हो म्हणोनी या यशाची आज हो तं स्वामिनी

**कात्यायनी** : स्वामी–

**याज्ञवल्क्य** : कात्यायनी–

एवढी झालीस — कां मनीं अस्थिर
विसरलीस कां — गौरवाचा भार ?
स्वर्गलोकीं तुझे — माझेही पूर्वज
तुझ्या मुद्रेकडे — पाहतात आज
ब्रह्मचारी आणि — प्रपंची गृहस्थ
वानप्रस्थ आणि — संन्यासी विरक्त
आश्रमांचें चक्र — सहज चालूं दे
माझें हें कर्तव्य — मजला पाळूं दे
म्हण कात्यायनी– — हो म्हण–

**कात्यायनी** : बाई ! बाई ! मज — कांहींच न कळे
घालोनी अंजन — सारावीं पडळें
उघडा मनाचे — झांकलेले डोळे

**मैत्रेयी** : सांग सखी सांग — तुज माझी भाक
विन्मुख न जावा — हा थोर याचक

**कात्यायनी** : ठीक आहे !
माझ्या कुटुम्बाच्या
कल्याणाचे साठीं
माझा शोकभार
दडपोनी पोटीं
देतें मी अनुज्ञा !

जावें तुम्हीं जावें !
नव्हे–
यावें तुम्ही यावें !
यावें तुम्हीं यावें !



## ३ : गंगातीरीं

निवेदक : जनहो आदरें ऐका रामाची पावनी कथा
दूर होतील ज्या योगें भवदास्य मनोव्यथा

[ दवंडीचा आवाज ]

वेत्रिक : ऐका रे ऐका रे गंगातीरवासी
सावधान ऐका कैवर्तांचा नेता
स्वामी गुहराज गंगेचिया तीरीं
बंदिनी पाशेचा पुत्रहत्येसाठीं
करीतसे न्याय सांगेल उपाय

[ गलबला होतो. नंतर शांतता ]

वेत्रिक : सावधान ! गुहराज !

गुह : परिसा साधुजनांनो पाशेनें काय रचियली माया
सापत्नकुमर ! वधिला काय करूं मी ? विचार सांगा या !

[ पाशा हुंदके देत आक्रस्ताळेपणानें म्हणते ]

पाशा : नाहीं नाहीं नाहीं !
दस्यूंच्या हातीं मीं सापडल्यें गाय
पुरुषाची जात कराल अन्याय
गुहपत्नी गंधा बोलवा तिजला
ती जो सांगेल तो न्याय मान्य मला

सभाजन : [ थोडा गलका करून ]
तथास्तु तथास्तु !

वैत्रिक : सावधान ! गुहपत्नी गंधा !

गुह : येई गंधे बैस न्यायासनावरी
न्यायाची प्रतिष्ठा तुझ्या स्कंधावरी

पाशा : [ लाडिकपणें ] पहा गडे गंधे तूंच कर न्याय.
पोर मेलें त्याला करूं तरी काय !
आलीस धावून माझी कौतुकाची
जीवाभावाची तूं सखी माहेराची

गंधा : [ कडक स्वरांत ] पाशे !

मी तटस्थ ठाऊका न मज कोणी बंधु सखा
मम करांत न्यायदंड रिपुमित्रां सारखा
तनय अगे पापिणी ! देऊन विष मारिलास
सर्वश्रुत हें झालें ! तुजवरती सिद्धदोष

( गीत ) कलंकिनी पाशे केवढा अन्याय
पुत्र सवतीचा मारिलास हाय
ममतेच्या राज्यीं समतेच्या ध्वजा
प्रजेतें सांभाळी दशरथ राजा
तेथ तूं सर्पिणी पिलांस जी खाय
पुत्र सवतीचा असोनी श्रीराम
कैकेयी मातेचें निरुपम प्रेम
स्नेहाळ ती माता करील गे न्याय

कैकेयी मातेकडे या पापिणीला धाडुनी
तीच देवा न्याय दण्डो पाठवो कां काननीं

पौर : साधु साधु साधु !

वेत्रिक : जाहला न्याय पाशेचा
सभा होत विसर्जन
सभा होत विसर्जन
सभा होत विसर्जन

[ गलका होतो. विरत तो नाहींसा होतो ]

गुह : गंधे !

| | |
|---|---|
| कैवर्त कुलाचा | न्याय सुविख्यात |
| निष्पक्ष म्हणोनी | जगतीं प्रख्यात |
| सखी तूं तयाची | राखलीस लाज |
| सांग गंधे तुज | काय देऊं आज ? |

गंधा : 

| | |
|---|---|
| पोटभरी मासे | रोजची भाकरी |
| लेकरांबाळांची | स्नेहाची चाकरी |
| आपुल्या चरणीं | असूं द्यावें प्रेम |
| अंतीं माझें मन | व्हावें जी निष्काम |

गुह : 

| | |
|---|---|
| तसेंच होईल | तसेंच होईल |
| तुझा हा संकल्प | सिद्धीला जाईल |

वेत्रिक : [ लांबून धांपा टाकीत येतो. विव्हल स्वरांत बोलतो ]
गुहराज !

गुह : [ आश्चर्यानें ] वेत्रिका !

वेत्रिक : गुहराज, अघटित प्राप्त कसें बोलुनीया दाखवूं ?
कर्तव्य माझें हाय ! हें कैसें तुम्हांला ऐकवूं ?

गुह : [ गंभीर स्वरांत ] वेत्रिका, सांग !
तुझ्या अघटित वार्तेचें विष—
पिऊन जाण्यास—
सिद्ध आहेत

श्रवण माझे !
सांग !

वेत्रिक : ऐकावा जी गुहा—

दुःखाच्या भारानें वांकून गेलेला
सचिव सुमंत तयाचा संदेश—
आज कैकयीचा पुरलासे छंद
राजा दशरथा झाला दुःखोन्माद
राज्य भरतासी देवानियां हाय !
वनासी निघाले रघुवीरराय
आहे जी लक्ष्मण तयांचिया संगें
सुमुखी वैदेही चाले मागें मागें
गंगातीरीं आज तयांचा निवास
कैसा हा दैवाचा विपरीत पाश !

गुह : [ अत्यंत आश्चर्यानें ] वेत्रिका !

वेत्रिक : [ दुःखानें ] स्वामीं मीं आपुल्या
डोळ्यांनीं पाहिले
वल्कलें ल्यालेले
प्रभु रामराय !

गुह : ( गीत ) शलभांनीं गिळलें रविमंडल
सिंह वधियला मृगबालांनीं
खवळुनि सागर व्यापित अवनी
गंधे ढळला आज हिमाचल

गंधा : [ अति विव्हल होऊन ]
अहो ! आतांच ना
आपण धाडिलें

बंदिनी पाशेला
कैकेयी राणीच्या
सुवर्णप्रासादीं
कैकेयी ! कैकेयी !

( गीत ) कैकेयी मायाविनी गे सांग हें केलेंस काय
धाडिली वनिं जनकबाळी धाडिला वनिं रामराय
वर्ण सुंदर नील श्यामल
पादपद्में परम कोमल
युगुल तें हिंडेल रानीं कंटकां तुडवीत जाय
पूर्ण करितां आपुले वर
वज्रपाताचि दशरथावर
भोंवतीं अंधार सारा पौर रडती धाय धाय
सांग हें केलेंस काय
सांग हें केलेंस काय

( प्रथम खण्ड समाप्त )

## द्वितीय खण्ड

[ अति कोमल सतारीच्या स्वरांनीं सुरुवात होते ]

राम : ये ! सीते ! सावकाश !
लक्ष्मणा !
तो समोर इंगुदी वृक्ष
तयाच्या छायेंत आईच्या मायेंत
(गीत) जानकी हें बघ गंगातीर
जेथ वाहतो झुळकत झुळझुळ पावन मंद समीर
चक्रवाक बघ सारस इथले
हेमवर्ण हंसांचीं युगुलें
भुवन उजाळित कलरव करिती पुलकित होत शरीर

थरथरणारीं अंबुजपर्णें
प्रफुल्ल कमलें नानावर्णें
मत्स्यांच्या क्रीडांनीं कैसें कंपित झालें नीर
ऋषिवर मुनिजन तापस मेळा
गंगास्नाना झाला गोळा
वेदऋचांचा ध्वनी उठतसे पवित्र गुण गंभीर

जानकी : अहा ! अहा ! हें किती मनोरम
शोभा इथली सुंदर निरुपम
हे कोकिल
हे शुक
या सारिका
हे स्वस्थपणें चरणारे
धष्ट पुष्ट वृषभराज
मृगशावक—गोवत्सें
पैल तिथें त्या गाई
स्तनांतुनी दूध गळे
हा चंदन
हा पाटल
या बदरी
हा पिंपळ
या वृक्षासवें डोलणाऱ्या
त्यांच्या मऊ मंद छाया
अहा अहा—

(गीत) हें सुख जर कां वनवासाचें
तर श्रीरामा ऐकायाचें—

राम : काय ? जानकी काय ?

सीता : छंद घेईन मी सासूबाईपाशीं
राहूं या अखंड अशीं वनवासी
[ लांबून गंधा येते. अस्फुट स्वरांत किंचाळते ]

गंधा : हाय !
काय वदलीस जनकनंदिनी

सीता : गंधे !

गुह : ( स्फुंदत ) वनवासी रामा !

राम : ये गुहा !

गुह : तुटतें हृदय फुटों पाहे प्राण
कैसा हा प्रसंग मांडिला निर्वाण
कैसा तुम्हा भेटूं मजला न कळे
द्यावा आशिर्वाद मिटावेत डोळे.

राम : ( गीत ) सांग कां झालास ऐसा खिन्न सखया मानसीं ?

सीता : आणि गंधे सांग बाई दुर्मुखी कां तूं अशी ?

दोघें : शेष का सांडी धरा
भानु त्यजुनी अंबरा
सांग कोठें लुप्त झाला काय संपेना निशी

गंधा : कैकेयीचा आतां घाला असे जीव
जाताती राजीव वनामाजीं
मायाविनी कृत्या झालें मनाजोगें
जाय रामामागें सीतामाई

राम : गंधे !

गंधा : सांगावें श्रीरामा वनांतले श्रम
काय मनोरम असताती
अनेक श्वापदें क्रूर हिंस्र तिथें

तुमच्या सांगातें जनकबाळी
चरणकमलें मृदु सुकुमार
पुष्पांचाही भार होत असे
राजमार्गावरी चालतां श्रमली
सोशील असलीं दुःखें कशीं ?

सीता : गंधे !

(गीत) सखी तूं अगदिंच वेडी कशी
शस्त्रधरांचे शोभति राजे
संगें असतां प्रियतम माझे
धाक तुझा हा वन्यपशूंचा मज कां पाडिल फशीं
नित्य सख्याचे पद प्रक्षाळीं
दहिंवरलेल्या प्रातःकाळीं
रात्रंदिन मी सन्निध राहिन श्रीशिवगिरिजा जशीं
जर का दमल्यें मार्गावरुनी
तळिं वृक्षाच्या कुठें थांबुनी
श्रीरामांच्या पदकमलांची करुनी राहिन उशी

गुह : छे सीते ! छे रामा !
कैकेयी कैकेयी केलेंस हें काय
वनासी धाडिलीं सीता रामराय

राम : गुहा !

(गीत) माय माझीं निंदितां कां सांग गुहका सांग गंधे
मुक्त मी हिंडेन रानीं
भरत राजा राज्य करुनी
भूषविल तो रविकुलाला
तोषविल तो साधु वृंदें

गुह : रामा ! मुक्त तुम्ही स्थितप्रज्ञ योगी
आम्हीच दुर्दैवी आम्हीच अभागी
आमची ही दशा साहिली पाहिजे
पुढील व्यवस्था पाहिली पाहिजे

राम : कसली व्यवस्था ?

गुह : कांहीं खाद्यपेयें सोमाचे चषक
झोंपण्यास तुम्हा प्रावर्णे मंचक

राम : गुहका !
आम्हासी आहार मधुर रसाळें
गंगातटाकींचीं कंदमुळें फळें
पर्णशय्या हाची आमुचा विश्राम
इथें वृक्षातळीं करूं या आराम

गुह : रामा ! रामा !

(गीत) काय करुं मी रामराया स्वर्णमंडित रंगशाला
आज माता त्रिभुवनाची
शेज त्यजुनी मंचकाची
शयन करिते भूवरी मग साज वस्त्रांचा कशाला
पर्णशय्येंतील कांटे
टोंचतिल अंगास वाटे
दंश करितिल क्षुद्र कीटक डाग हा अमुच्या यशाला

राम : ऐक रे गुहका !
मान अपमान यश अपयश
सहावें लागतें ! वहावें लागतें
सागराचे परी ज्याचिये अंतरीं
गहन आशय जो असे निर्भय
तोचि स्थितप्रज्ञ तोचि कर्मयोगी

वसिष्ठ मुनींनीं सांगितली खूण
या नांव अद्वैत खरें ब्रह्मज्ञान

गंधा : ब्रह्माचें ज्ञान अम्हा रामराय सांगुं नका
अंधारुनि येत पहा व्यर्थ अतां जागुं नका

गुह : चल गंधे !

[ दोघें चालतात ]

शोधुन पर्णे
रचुं या शय्या
सुगंध चंदन
पिंपळ कांचन
कोमल पल्लव
ज्यां पर्णे नव
आणुनि मांडूं
मग गंगातट
झाडुनि काढूं
पेटवुनी मग
कांहीं काष्ठें
करूं जागती
काळी रजनी

गंधा : कां ?

गुह : तुज नसे ठावें कैकेयी पापिणी
आज रात्रीमाजीं सैन्य पाठवोनी
कराया बघेल श्रीरामाचा घात
एकला लक्ष्मण असे असमर्थ
आपण सशस्त्र रामाभोंतीं जागूं
समय आलिया प्राणांसही त्यागूं

गंधा : ( आनंदानें ) अहो !

गुह : काय गंधे ?

गंधा : ( गीत ) माझिये मानसीं आनंदी आनंद—

आज रामकाजीं पडेल ही काया
मेघ सैनिकांचे येतील वोळून
गंगातीरीं त्यांना येईल कळून
गुहासवें त्याची शस्त्रधारी जाया
शरचाप करीं सज्ज मी राहीन
प्राण तुम्हासंगें आपुला वाहीन
हारपेन रणीं वृक्षासवें छाया

## तृतीय खण्ड

[ पक्ष्यांच्या आवाजानें प्रारंभ ]

राम : ( गीत ) ऊठ जानकी ऊठ ऐक हे पक्षी बघ बोलती
सख्या लक्ष्मणा प्रसन्नवातें तरुवर वनिं डोलती
सूर्यबिंब हें सन्निध आतां गगनाचे अंगणीं
रक्तवर्ण ध्वज दिसूं लागला पूर्वेचे प्रांगणीं
अरे ! आणि तें पश्चिमेस काय ?
शस्त्रसज्ज गंधा आणि गुहराय
यावें गुहा ! पुरे संशयाचा भार
संपली रे निशी निमाला अंधार

गंधा : अंधार निमाला ? नव्हे पातली रजनी
संपणार रामा जी चौदा वर्षांनीं

राम : लक्ष्मणा—
कांहीं पर्णद्रोण घेवोनिया सवें
पैल त्या वडाचें दूध त्वां आणावें

गुह : छे छे रामा !
गंधे ! जा जा वेगें कपिला गाईस शीघ्र दोहून
घट दुग्धानें भरला येई सखे सत्वरींच घेऊन

राम : नव्हे नव्हे गुहा !
मज जें कां हवें
तें हें दूध नव्हे

गुह : [ आश्चर्यानें ] तें हें दूध नव्हे ?

गंधा : बघतां आश्चर्ये कां हो रामाकडे
सीतामाई तुम्ही उकला हें कोडें

सीता : सखी ग आश्चर्य आहे त्यांत काय ?
वडाचा तो चीक
घालून आपुल्या
काजळासारख्या
काळ्या केशभारीं
वळोनीया जटा
ऋषी शोभतील माझे रामराय !

गुहगंधा : काय ? हाय ! हाय !

गुह : अहो रामराया मला कां वधा ना ?
वरी खड्ग कां हो सुखें चालवा ना !
उरीं माझिया मारुनी बाणपाश
वळाव्या जटा राघवा सावकाश

गंधा : जानकी जानकी सांग कसें साहूं ?
सुंदर रामांचें असुंदर रूप
सांगा कसें पाहूं सांगा कसें पाहूं ?
तुम्ही कशा झालां एवढ्या कठोर ?
तुम्हा न पाहवे काळा केशभार !

सीता : गंधे ! अग गंधे !

(गीत) मजवरी गंधे करिसी अन्याय
सुंदर रूपांत अमूर्त जी मूर्ती
तीच गे माझिया मनींची विश्रांती
हारपेल तनु राहील जें रूप
तेच गंधे माझे प्रिय रामराय
नेत्रकमलांत देखणी जी दृष्टी
तीच सखी माझी आनंदाची सृष्टी
वरल्या रूपासी भुलेन कां कधीं
केशभारासाठीं म्हणेन कां हाय

गंधा : धन्य जगन्माते धन्य तुझा भाव
अहा कैसा घाव सोसलास
धन्य सीतामाई तुझें हें चरित्र
धन्य हें विचित्र धैर्य तुझें
आणावें लक्ष्मणा वटदुग्धपात्रा
वळावा पवित्रा जटाभार

सीता : ऐकावें भावोजी आज दीपावली
वडाच्या दुधानें साजरी जाहली
मस्तकीं घालितें
तुम्हाला न्हाणि तें

राम : गुहा आण अतां नौका आम्हाला पैल जाउं दे
प्रेम आम्हावरी ऐसें हें चिरंतन राहुं दे

गंधा : थांबा !

गुह–राम–सीता : कां ?

गंधा : पद प्रक्षाळुन श्रीरामांचे
जगदाधार घनःश्यामांचे
मग नौकेमधिं बसवायाचें

राम : कां गंधे बाई ! एवढा लोभ ?

गंधा : राम हे नाटकी आणि श्री जानकी
पाहतां पाहतां नाव हरपेल कीं !

गुह : कशी ?

गंधा : अहो ऐका मागें चरणांची धूली
लागतां शिळेची रमणी कीं झाली
आतां या नावेची जर होय नार
जाळील ती माझा सुखाचा संसार

सीता : धन्य बाई गंधे धन्य तुझी बुद्धी
तुझें विस्मरण होईल ना कधीं
एकच जाणीव बोंचते हृदया
मजपाशीं नाहीं कांहीं तुज द्याया

गंधा : आहे ना !

सीता : काय ?

गंधा : ( गीत ) वर द्या देवी मला जानकी वर द्या देवी मला
हींच शरीरें जन्मोजन्मीं
घेउन यावें भूवरि आम्हीं
अशाच एका सुंदर रात्रीं या मज भेटायला
असेंच तुम्हीं व्हावें सीता
संगें घ्यावें या रघुनाथा
असेच लक्ष्मण, असेंच आपण ल्यावें या वल्कला
नौकेमाजीं असेंच बसुनी
पैल चलावें गंगेमधुनी
असेंच ठेउन मस्तक चरणीं होऊं द्या विव्हला

सीता : गंधे !

गधा : वर द्या देवी मला जानकी वर द्या देवी मला

# ४ : वंजारी गीत

पार्श्वगायक : ऐका वंजाऱ्याच्या लग्नाची कथा
हुम्बा हो रे    हुम्बा हो रे

सामूहिक वंजारी गीत : शिवा रे सरजा    संकर राजा
वनाच्या देवा    रानाच्या राजा
तुझ्या दरशेना    आले वंजारे
हुम्बा हो रे    हुम्बा हो रे

तुझ्या कुरपेनं    वंजारे जातीला
लुटींत भेटती    धनाचे हाण्डे
तुझ्या कुरपेनं    भरारा धावती
रातीं बेरातीं    वंजारे घोडे
हुम्बा हो रे    हुम्बा हो रे

तुझ्या कुरपेनं    धरतीवरी
उभे राहीले    डोंगर कडे
तुझ्या कुरपेनं    पान्याचा मासा
आभाळामंदीं    भरारा उडे
हुम्बा हो रे    हुम्बा हो रे

तुझ्या कुरपेनं रानाच्या मंदीं
कोरड्या रुखा पालवी फुटे
तुझ्या कुरपेनं संभ्या वंजाऱ्याच्या
तरण्या लेकीला दादला भेटे
हुम्बा हो रे हुम्बा हो रे

तुझ्या कुरपेनं पेरल्या शेतीं
जवारी बाजरी झोकांत डुलऽ
तुझ्या कुरपेनं उन्हाळ्यामंदीं
रानच्या चाफ्याला येत्याती फुलऽ
हुम्बा हो रे हुम्बा हो रे

तुझ्या कुरपेनं आभाळामंदून
भुरू र भुरू पाबस गळऽ
तुझ्या कुरपेनं रंभा वंजाऱ्याच्या
साजऱ्या लेकाला बायकू मिळऽ
हुम्बा हो रे हुम्बा हो रे

वाघाचें गर्जन : आंव्–आंव्–आंव्

पुरुष : वाघरू र वाघरू! वाघरू र वाघरू!
व्हा ग तुम्ही मागं व्हा ग तुम्ही मागं

[ बायकांना मध्यें घेऊन पुरुष त्यांच्या भोंवतालीं कडें करतात ]

नवरदेव भिवऱ्या : चाल ये रे वाघरा चाल ये रे वाघरा
माझ्या तीराला फाळ पोलादी
कामठ्याला र तातीची वादी

सामूहिक : हुम्बा हो रे हुम्बा हो रे

नवरी गोजी : [ काकुळतीनें ] आर आर भिवऱ्या!

भिवऱ्या : मागं हो गोज्ये !

गोजी : मागं मी भिवऱ्या ऱ्हाऊं र कशी ?
संभा वंजाऱ्याची रांगडी लेक
संकरामागं भिल्लीण जशी

सामूहिक : भले रे भिवऱ्या हुम्बा हो रे
भले गोजाई हुम्बा हो रे

[ भिवऱ्या बाण मारतो, वाघ मरतो ]

भिवऱ्या : [ डौलांत ] वाघरू घ्या रे खांद्याच्या वरी
हांसत नाचत डौलांत चाळं

सामूहिक : सोन्याचे दांत रुप्याचीं नखं
दादला बायकूच्या गळ्यांत घाळं
हुम्बा हो रे हुम्बा हो रे
शिवा रे सरजा संकर राजा
वनाच्या देवा रानाच्या राजा
तुझ्या कुरपेनं भिवऱ्या वंजाऱ्यानं
रानाच्या मंदीं मारिला वाघ
भला रे देवा भला रे राजा
असाच आपुल्या बिरदाला जाग
हुम्बा हो रे हुम्बा हो रे
हुम्बा हो रे हुम्बा हो रे
हुम्बा हो रे हुम्बा हो रे



## ६ : इर्जीक

सामूहिक : आखाडाचा मास म्होरं न्हायला र उभा
काळी काळी झाली बगा गगनाची सोभा
नांगुरवाले औतकरी
शेतकरी कामकरी
गांवकरी शीवकरी
गाती दिमाखानं
इर्जीकीचं गाणं
र इर्जीकीचं गाणं

एक शेतकरी : कोंबडयाची साऽद मला ऐकूं आली
आभाळाची सोभाऽ लाल लाल झाली
चला रे चला
भले गडी चला
चला रे चला
अवघे गडी चला

गीत : चाल् रे गड्या शेतकऱ्या
चाल् रे गडया कामकऱ्या
झालं गडया झुंजूमुंजू
चौघडा र लागे वाजूं
गाई गुजी घेऊन निघा
चाल् रे गडया शेतकऱ्या
चाल् रे गडया कामकऱ्या

आखाडाचं आलं वारं
आलीं जोसांत थोरंपोरं
अवघे मिळूं लेझीम् खेळूं
चाल् रे गड्या शेतकऱ्या
चाल् रे गडया कामकऱ्या

पालवलीं रानंवनं
कोरडया रुखा फुटलीं पानं
आई पांढरी हांऽक मारी
चाल् रे गडया शेतकऱ्या
चाल् रे गडया कामकऱ्या

शेतामंदीं कष्ट करूं
आपुन् गडी शेतं पेरूं
गोफण घेऊन रानं राखूं
चाल् रे गडया शेतकऱ्या
चाल् रे गडया कामकऱ्या

* * *

गोजाबाई : बाई पंढरीचा राजा
राजा उभा विटेवरी
माज्या बाळाच्या पाळन्या
सोभे रेसमाची दोरी

बाई पंढरीच्या वाटे
वाटे संत झाले गोळा
माज्या बाळाच्या ग पांई
घाला सोनियाचा वाळा
बाई पंढरीच्या रानीं
रानीं फुलल्या तुळशी
शेजीं बंधूराजा माजा
गेला कीं ग दूरदेशीं
बाई पंढरीचा वारा
वारा वाहे झुळूझुळू
शेजी बाळराजा माझा
लागला ग धाऊं पळूं

म्हादा : कारबारनी आन
न्ह्यारीचं पान
भाकरीला पटनी
बोंबलाची चटणी
संगं हिरवा कांदा
अन् मिरचीचा चेंदा
धह्याचं लोटकं
ताकाचं मडकं
कारबारनी आन
माजं न्ह्यारीचं पान

गोजाबाई : अव अव कारभारी
कसं सांगूं तुम्हा तरी

म्हादा : काय झालं काय झालं?

गोजाबाई : घरीं न्हाई मीठ
बेसनाचं पीठ
भाजी ना पाला
काय करूं बोला
लेकरूं रडतंय्
तापानं पडतंय्
मरगळल्यावानी
त्याला औशद ना पानी

म्हादा : बरं बरं बरंऽ
पुरं झालं पुरंऽ
किटले माजे कान
वाइच तमाखु आन

गोजाबाई : कोपऱ्यांत बगा
रिकामा डबा
हाय् तिथं उबा
अत्र तुमी धनी
ऐकाल का माजं

म्हादा : काय काय काय ?

गोजाबाई : गांवचा झाला पेरा

म्हादा : त्याला पटकीचा फेरा !

गोजाबाई : असं कां हो बोलतां ?
असं कां हो चालतां ?
गावाला समद्या
शिव्या कां हो घालतां ?

म्हादा : मग काय करूं ?
थुकी झेलीत फिरूं ?
पिकदानी धरूं ?

गोजाबाई : कांहीं कसं उमजना
भळी पडल्या समद्या राना
कवा व्हावी नांगरनी?
कवा व्हईल कोळपनी?

*　　*　　*　　*

[ दाजी पाटलाच्या घरासमोर वारकरी गात आहे. ]

वारकरी : खेळ मांडियेला वाळवंटीं घाई
नाचति वैष्णव भाई रे
वर्ण अभिमान विसरली याती
एकएका लोटांगणीं जाती रे
निर्मळ चित्तें झालीं नवनीतें
पाषाणा पाझर फुटती रे
होतो जयजयकार गर्जत अंबर
मातले वैष्णववीर रे
तुका म्हणे सोपी केली पायवाट
तरावया भवसागर रे

दाजी पाटील : भले भले भले वारकरी दादा
आज हाय् एकादशी जेवायला या उंद्या

गोजाबाई : अव काका! दाजी!

दाजी : कोन हाय्? गोजी?

गोजाबाई : व्हय दाजी लेक तुमची आपल्या घरीं आली
वादळानं भ्याली हरणी आली झाडाखालीं

दाजी ये माज्या लेकी!
हाएस ना सुखी?

गोजाबाई : ज्याच्या गळा अडकला नशिबाचा फासा
सुखा कसा व्हावा काका आगींतला मासा?

दाजी : का ग बाई का ?
गोजी : हिरद्यांतलं दुख दाजी तुम्हां कसं सांगूं
इकडं आड तिकडं विहीर सांगा कशी वागूं
दाजी : सांग पोरी आपल्या दाजीला सांग !
गोजी : कसं सांगूं ? घरधनी–
दाजी : सांग पोरी सांग
गोजी : त्यांना बाटलीचा नाद !
गांजाची पुडी !
भांगेचा लोटा–
नशिबाचा लेख दाजी
हाय् माज्या खोटा !
दाजी : सांग पोरी सांग—
कसं काय करूं ?
मुसक्या बांधूं त्याच्या ?
चाबकानं मारूं ?
गोजी : नका नका ! दाजीकाका !
दाजी : मग काय सांग ?
गोजी : आतां उद्यां पडल् पानी
धरती पिकल सोन्यावानी
पर—
दाजी : पर काय पोरी ?
गोजी : दाजीकाका आमच्या रानीं
नाहीं झाली नांगरनी
नाहीं झाली कोळपनी
दाजी : हात्तिच्या एवढंच ?
उद्यां तुझ्या रानीं

इर्जीक घाल्हूनशानी
आम्ही करू नांगरनी
आम्ही करू कोळपनी

गोजी : दाजीकाका—!

दाजी : व्हय् पोरी!

* * * *

दाजी : विठ्या म्हाद्या
या रे या रे!
पघा पघा
जमले सारे?

विठ्या : व्हय् दाजी व्हय् दाजी

दाजी : भले गडी भले गडी
नीट शेज धरा
एकामागून एक औत
हांका भरा भरा

सामूहिक : चाल रे चंद्या चाल रे नांद्या
परजेन राजा यायचा उंद्या
चाल रे चंद्या चाल रे नांद्या
सुर्व्या देवाचं तापलं ऊन्ह
भाजून्‌शानी निघालीं रानं
शेजीनं आतां औतं चाल्हं द्या
तासामागून चाल्हं द्या तास
दान्यांची उंद्या पिकल् रास
धरतीवरी घाम गळूं द्या
झाले रे काळे डोंगरदरे

आटून गेले रानचे झरे
कौल देवाचा कामीं लागूं द्या

दाजी : भले रे गडी
भले रे गडी
आपुल्या र
भावासाठीं
घातली उडी
भले रे गडी

सामूहिक : एक अमुचा देश गडे हो
एक अमुचा वेऽश
आजवरी भावाभावाची
झाली होती ताडातोडी भल रे गडी
एक अमुचं खाणं पिणं
एक अमुचं घेणं देणं
एका जीवानं एका भावानं
नांदल् अमुची म्होरली पिढी भले रे गडी
एका जुटीनं शेतं पेरूं
एका मुठीनं सारा भरूं
दिसाया जरी न्यारऽ न्यार
एक आमुची हाय् र कुडी भले रे गडी

**स मा प्त**